कुटुंब कल्याण कार्यक्रमांतर्गत मंजूर १३८४ अस्थायी पदांना दि.०१.१०.२०१८ ते दि. २८.०२.२०१९ या कालावधी करीता मुदत वाढ देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः अस्थायी २०१८/प्र.क्र.३६१/ कु.क.

१० वा मजला, बी विंग, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, लो.टि. मार्ग, मुंबई- ४०० ००१
तारीख: २० सप्टेंबर, २०१८

वाचा -

१) सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्रमांकः अस्थायी -२०१८/प्र.क्र.३६१/ कु.क., दि. २० जुन, २०१८
२) सह संचालक, आरोग्य सेवा (अ व प्र), मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/ आस्था/ कक्ष ५/टे ५/ १३८४ अपदे/५५५९- ६०/१८, दि. १९/०९/२०१८.
३) वित्त विभाग,शासन निर्णय क्रमांकः पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आपुक, दि.०७.०९.२०१८

प्रस्तावना -

कुटुंब कल्याण कार्यक्रमांतर्गत विविध योजनांतर्गत कार्यरत असलेल्या १३८४ अस्थायी पदांना दि. २०/०६/२०१८ च्या शासन निर्णयान्वये दि.०१/०३/२०१८ ते ३०/०९/२०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. सदर अस्थायी पदांना पुढील मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र. २ अन्वये शासनास प्राप्त झाला आहे. त्यानुषंगाने १३८४ अस्थायी पदांना दि. ०१/१०/२०१८ ते दि. २८/०२/२०१९ पर्यंत पुढे चालु ठेवण्यास मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे

## शासन निर्णय-

कुटुंब कल्याण कार्यक्रमांतर्गत विविध योजनांच्या अंमलबजावणीकरीता मंजूर असलेल्या अस्थायी पदांच्या आढाव्याबाबतचा प्रस्ताव आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी केंद्र शासनांस सादर केला असुन या प्रस्तावात नमुद केल्यानुसार अनावश्यक पदे प्रत्यार्पित करुन उर्वरित आवश्यक त्या पदांना केंद्र शासनाकडून मान्यता प्राप्त होण्याच्या अधिन राहून तसेच वित्त विभागाच्या दि.०७/०९/२०१८ च्या शासन निर्णयान्वये उपरोक्त अस्थायी पदांना दि.०१/१०/२०१८ ते दि.२८/०२/२०१९ पर्यंत पुढे चालू ठेवण्यांस या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

सन २०१८-२०१९ या आर्थिक वर्षा करिता सदर पदावरील खर्च खालील विवरणपत्रात दिलेल्या लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पीत केलेल्या मंजूर तरतुदींतून भागविण्यात यावा.

| १३८४ अस्थायी पदांच्या वेतनावरील खर्च खालील लेखाशिर्षातून भागविण्यात यावा. | | | |
|---|---|---|---|
| **अ.क्र.** | **योजनेचे नाव** | **पदसंख्या** | **पदांवरील खर्च दर्शविणारे लेखाशीर्ष** |
| **१** | **२** | **३** | **४** |
| १ | नागरी भागातील आरोग्य सेवांची पुनर्रचना | १९२ | **अ) शासकीय संस्थेमार्फ़त चालविले जाणारे आरोग्य केंद्र-** मागणी क्रमांक. आर-१, २२११- कुटुंब कल्याण, १०२- नागरी कुटुंब कल्याण सेवा, (०१) नागरी कुटुंब कल्याण सेवा १००टक्के केंद्र पुरस्कृत योजना- (०१) (०१) नागरी कुटुंब कल्याण केंद्र (२२११ ०१७६) |
| | | ११४५ | **ब) स्थानिक संस्था व इतर संस्थेमार्फ़त चालविली जाणारी आरोग्य केंद्र -** मागणी क्रमांक. आर-१, २२११- कुटुंब कल्याण, १०२- नागरी कुटुंब कल्याण सेवा, (०१) नागरी कुटुंब कल्याण सेवा १००टक्के केंद्र पुरस्कृत योजना- (०१) (०२) स्थानिक संस्था व इतर संस्थांनी चालविलेल्या नागरी कुटुंब कल्याण नियोजन केंद्रांना अनुदाने ( २२११ ०१८५) |
| | | ४७ | **क) शहरी कुटुंब कल्याण केंद्रे-** मागणी क्रमांक. आर-१, २२११- कुटुंब कल्याण, ००१- संचालन व प्रशासन, (०१) राज्य कुटुंब कल्याण केंद्र १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना- (०१) (०४) शहरी कुटुंब कल्याण केंद्र ( २२११ ००६९) |
| | **एकूण (अ)** | **१३८४** | |

टिप - प्रत्यार्पित पदे वगळण्याची कार्यवाही आयुक्त स्तरावर केली जाईल.

सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक, दि.०७/०९/२०१८ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१९१४३७२१६४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ujwala Arun Ransing

Digitally signed by Ujwala Arun Ransing
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a7788b3b31e2d9269bcbfd9588a6ee4771341780133d295a56dd4ef476977773, serialNumber=3b8f98f1c182bf458a4deee399a7241b5044aeb09c097bc6d28b58709fe8ef0d, cn=Ujwala Arun Ransing
Date: 2018.10.22 10:53:05 +05'30'

**(उज्वला अ. रणसिंग)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल,महाराष्ट्र -१/२ (लेखापरीक्षा/(लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
२. अधिदान व लेखा कोषागार, मुंबई.
३. आयुक्त (कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
५. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटुंब कल्याण, पुणे
६. निवासी लेखाधिकारी, मुंबई
७. सचिव,आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, केंद्र शासन, निमार्ण भवन,नवी, दिल्ली
८. विभागीय संचालक (कु.क.), ८२/२, पर्वती, पहिला माळा, दर्पण बिल्डींग, सहकार नगर, पुणे
९. आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
१०.सह संचालक (अर्थ व प्रशासन ), आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
११.उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ (सर्व)
१२.उप संचालक, आरोग्य सेवा (परिवहन), पुणे
१३.जिल्हा शल्य चिकित्सक , सामान्य रूग्णालय (सर्व)
१४.जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)

१५.वैद्यकीय अधिकारी, केंद्रीय रूग्णालय, उल्हासनगर , जिल्हा- ठाणे

१६.प्राचार्य, नागपूर कॉलेज ऑफ़ होमिओपॅथी व बायोकेमिस्ट्री, ५४३, आश्रमशाळा, लेआऊट , ग्रेटनाग रोड , नागपूर- ४४० ००९.

१७. जिल्हा कोषागार अधिकारी , पुणे

१८. वित्त विभाग(व्यय-१३) मंत्रालय, मुंबई.

१९. निवडनस्ती ( कु.क.).